"सन २०२४-२५ या आर्थिक वर्षात परदेशी शिष्यवृती योजनेअंतर्गत निवड केलेल्या विद्यार्थ्यांसाठी निधी वितरीत करण्याबाबत".

**महाराष्ट्र शासन**
**अल्पसंख्याक विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : अविवि २०२५ / प्र. क्र. ६७ / का-६**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक,
मंत्रालय, मुंबई ४०००३२
दिनांक : ०४ जून, २०२५

<u>वाचा</u> :- १. शासन निर्णय : अविवि २०१९ / प्र. क्र. २११ / का-६, दिनांक २३.११.२०२३.
२. शासन निर्णय : अविवि २०२३ / प्र. क्र. १०० / का-६, दिनांक १४.०५.२०२४.
३. शासन पूरकपत्र क्रमांक : अविवि २०१९ / प्र. क्र. २११ / का-६, दिनांक २०.०६.२०२४.
४. शासन शुद्धीपत्रक क्रमांक :- अविवि २०१९ / प्र. क्र. २११ / का-६, दिनांक २०.०९.२०२४.
५. शासन निर्णय क्रमांक :- अविवि २०१९ / प्र. क्र. २११ / का-६, दिनांक ०४.१०.२०२४ व दि. ०७.०३.२०२५
६. विभागाचे समक्रमांकाचे पत्र दिनांक २७.१२.२०२४
७. समाजकल्याण आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, ३, चर्च पथ, पुणे या कार्यालयाचे दि. ११.०४.२०२५ रोजीचे पत्र.

**<u>प्रस्तावना :-</u>**

अल्पसंख्याक विकास विभागातील मुलामुलींना परदेशी उच्च शिक्षणासाठी शिष्यवृती योजनेअंतर्गत शासन निर्णय, संदर्भ क्रं. १ दिनांक २३.११.२०२३ च्या तरतुदीनुसार सन २०२४-२५ या शैक्षणिक वर्षाकरिता शासन निर्णय संदर्भ क्र ५ नुसार एकूण ४८ विद्यार्थ्यांची अंतिम निवड करण्यात आली आहे. तसेच शासन निर्णय संदर्भ क्र ३ मध्ये नमूद दि. ४.१०.२०२५ रोजीच्या शासन निर्णयान्वये निवड केलेल्या २४ विद्यार्थ्यांपैकी २ विद्यार्थांनी शासनाच्या इतर विभागाकडील शिष्यवृत्ती स्विकारणार असल्याचे कळविल्याने, सदर दोन्ही विद्यार्थ्यांची या विभागामार्फत सन २०२४-२५-परदेश शिष्यवृत्ती साठी केलेली निवड संदर्भ क्र. ७ मधील पत्रान्वये रद्द केली आहे

सन २०२४-२५ करिता परदेश शिष्यवृती योजनेंतर्गत निवड केलेल्या विद्यार्थ्यांपैकी ९ विद्यार्थ्यांना सन २०२४-२५ या आर्थिक वर्षामध्ये शिष्यवृत्ती रक्कम अदा करण्यात आली असून आता उर्वरीत विद्यार्थ्यांना शिष्यवृत्ती रक्कम अदा करण्यासाठी रु १०.०० कोटी /- (अक्षरी रुपये दहा कोटी फक्त) मिळणेबाबत समाजकल्याण आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे यांनी संदर्भ क्र. ७ नुसार मागणी केली आहे.

सद्यस्थितीत वित्त विभागाकडून बीम्स प्रणालीवर रू. ३.६० कोटी इतका निधी उपलब्ध करून दिला आहे. सदर निधी वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन आहे.

**शासन निर्णय :-**

१. सन २०२४-२५ करिता परदेश शिष्यवृती योजनेअंतर्गत निवड केलेल्या विद्यार्थ्यांसाठी रक्कम रू ३.६० कोटी (अक्षरी तीन कोटी साठ लक्ष फक्त) इतका निधी वितरीत करण्यास याद्वारे मंजूरी देण्यात येत आहे.

२. समाजकल्याण आयुक्तालय, पुणे यांनी उपरोक्त प्रमाणे वितरीत करण्यात आलेल्या निधीच्या तरतूदीच्या मर्यादेत विहित प्रयोजनासाठी खर्च करावा. निधी खर्च झाल्यावर खर्चाचे विवरण (जिल्हा निहाय / लाभार्थी संख्या) व उपयोगिता प्रमाणपत्र न चूकता शासनास सादर करण्याची जबाबदारी नियंत्रक अधिकारी तथा आयुक्त समाजकल्याण आयुक्तालय, पुणे यांची राहील.

३. उपरोक्त निधी विद्यार्थ्यास वितरीत करत असताना विद्यार्थ्यांनी सादर निधी मागणीचा प्रस्ताव तपासून, विद्यापिठाच्या कागदपत्रांची पडताळणी करून, सदरचा निधी विद्यार्थ्यांस ज्या शैक्षणिक प्रयोजनाकरिता मंजूर करण्यात आलेला असेल त्याच प्रयोजनार्थ खर्ची पडेल याची खातरजमा करण्याची जबाबदारी आयुक्त, समाजकल्याण आयुक्तालय, पुणे यांची राहील.

४. सदर निधी खर्च करताना वित्तीय नियमावली, महाराष्ट्र अर्थसंकल्प नियमपुस्तिका तसेच वित्त विभागाने वेळोवेळी निर्गमित केलेल्या शासन निर्णय / परिपत्रक यातील अटी व शर्तीचा भंग होणार नाही, याची दक्षता घेण्याची जबाबदारी आयुक्त, समाजकल्याण आयुक्तालय, पुणे यांची राहील.

५. सदर खर्च हा सन २०२५-२६ या आर्थिक वर्षात " परदेशात पदव्युत्तर पदवी आणि पी.एच.डी. करत असलेल्या अल्पसंख्याक विद्यारथ्यांना परदेशी शिष्यवृत्तीसाठी सहायक अनुदान (कार्यक्रम),(२२३५ डी ६१३), “मागणी क्रमांक झेडई -१, २२३५ सामाजिक सुरक्षा व कल्याण ,०२-समाजकल्याण, २०० इतर कार्यक्रम,००, (००), (२१), अल्पसंख्याक विद्यार्थ्यांकरिता परदेशात पदव्युत्तर पदवी व पी.एच.डी साठी शिष्यवृती योजना (कार्यक्रम), (२२३५ डी ६१३) सहायक अनुदाने (वेतनेतर), ३४ शिष्यवृत्या / विद्यावेतन” या लेखाशिर्षखाली खर्ची घालून त्या अंतर्गत चालू आर्थिक वर्षात मंजूर करण्यात आलेल्या तरतूदी मधून भागविण्यात यावा. याकरिता समाजकल्याण आयुक्तालयाचे लेखाधिकारी (कर्ज), समाजकल्याण आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे यांना "आहरण व संवितरण अधिकारी" म्हणून प्राधिकृत करण्यात येत आहे.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेताक २०२५०६०४१७३७४१४४१४ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

**महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने**

MEGHANA GAURAV SHINDE

Digitally signed by MEGHANA GAURAV SHINDE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=MINORITY DEVELOPMENT DEPARTMENT,
2.5.4.20=d29224e30812c4523eedb32c54f5cbc27548f81ccf656192b6d735115af1dfb8, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=D625CF85C370BB4C35F332D5F951F0A9CD61FAD5DDF056809A969BFDD9FDB7DA, cn=MEGHANA GAURAV SHINDE
Date: 2025.06.04 17:38:57 +05'30'

**(मेघना गौरव शिंदे)**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन.**

**प्रत,**

१. मा.राज्यपालांचे सचिव,
२. मा.मुख्यमंत्र्यांचे प्रधान सचिव,
३. मा. मंत्री/ मा. राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव
४. मा. विरोधी पक्षनेता विधान सभा/ विधान परिषद, विधान मंडळ सचिवालय, विधान भवन, मुंबई
५. सर्व मा. विधान सभा/ विधान परिषद सदस्य
६. मा. मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन
७. अपर मुख्य सचिव/ प्रधान सचिव/ सचिव सर्व मंत्रालयीन विभाग
८. महालेखापाल १/२ (लेखा व अनुज्ञेयता), मुंबई/ नागपूर
९. महालेखापाल १/२ (लेखापरीक्षा), मुंबई/ नागपूर
१०.अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
११.निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई
१२.सर्व विभागीय आयुक्त
१३.आयुक्त, नगरपालिका प्रशासन, मुंबई
१४.सर्व जिल्हाधिकारी
१५.आयुक्त, सर्व महानगरपालिका
१६.सर्व जिल्हा परिषदांचे मुख्य कार्यकारी अधिकारी,
१७.सर्व मुख्य लेखा व वित्त अधिकारी, जिल्हा परीषद
१८.सर्व मुख्याधिकारी, नगरपालिका
१९.सर्व शिक्षणाधिकारी (प्राथमिक)
२०.सर्व शिक्षणाधिकारी (माध्यमिक)
२१.सर्व जिल्हा नियोजन अधिकारी
२२.सर्व मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग
२३.सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, विधानभवन, मुंबई (पत्राने)
२४.महासंचालक, माहिती व जनसंपर्क महासंचालनालय (प्रसिध्दीसाठी)
२५.अल्पसंख्याक विकास विभाग, मंत्रालय, मुंबईमधील सहसचिव / उपसचिव /अवरसचिव/ कक्ष अधिकारी
२६.निवडनस्ती कार्यासन ६